**खरेदी केलेल्या कापूस साठयास आगीमुळे झालेल्या नुकसानीची आग चौकशी समितीच्या वित्तीय मर्यादांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

**शासन निर्णय क्रमांक-कापूस-२००९/प्र.क्र.१०८/१-स,**

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२,

**दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०१०.**

वाचा - १) शासन निर्णय कृषि व सहकार विभाग क्र.-कापूस-५८८९/प्र.क्र.११४५/१-स, दि. ६.१०.१९८६.

२)शासन परिपत्रक, कृषि व सहकार विभाग क्र. कापूस ५८९६/प्र.क्र.७६/१स, दि.२८.२.१९९६.

३) शासन निर्णय सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. कापूस ५८२०/प्र.क्र. २९१/ १ स, दि. ३.८.२०००.

**प्रस्तावना -** कापूस खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात आलेल्या कापसाच्या साठयांना लागणा-या आगींची चौकशी करण्यासाठी विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय समित्यांची स्थापना करण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनाने या सर्व प्रकरणांची दखल घेऊन आगींसंबंधात परिणामकारक उपाययोजना करण्याविषयी राज्य शासनास कळविले होते. कापूस खरेदी योजनेंतर्गत खरेदी केलेला कापूस हा शासनाची मालमत्ता असल्याने कापसाचे आगीपासून संरक्षण करुन राष्ट्रीय संप्पत्तीची हानी टाळण्यासाठी संदर्भाधिन१, २, व ३ येथील आदेश अधिक्रमित करुन आग चौकशी समित्यांची नियुक्ती करुन नुकसानीची मर्यादा वाढविण्याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाचे संचालक मंडळाने ठराव करुन शासन मान्यतेसाठी पाठविला आहे. ही बाब विचारात घेऊन परिपत्रकानुसार निर्देशित आग समित्यांना आगीमुळे झालेल्या नुकसानीसाठीचे वित्तीय मर्यादेत खालीलप्रमाणे वित्तीय मर्यादा वाढविण्यास शासन मंजूरी देत आहे.

## शासन निर्णय :-

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयानुसार जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या आग चौकशी समित्यांच्या वित्तीय मर्यादेत खालीलप्रमाणे वित्तीय मर्यादेत वाढ करण्यात येत आहे.

१) रु.१ कोटीपेक्षा अधिक नुकसानीबाबतच्या आगीची चौकशी करण्यासाठी जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे आग चौकशी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अ) जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| ब) जिल्हा पोलीस अधिक्षक | सदस्य |
| क) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत महामंडळ | सदस्य |
| ड) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| इ) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ म. | सदस्य सचिव |

२)रु.३० लाख ते रु.१ कोटीपर्यंतच्या नुकसानीबाबतच्या आगीची चौकशी करण्यासाठी उपविभागीय अधिकारी ( महसूल ) ( एस.डी. ओ.) यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे आग चौकशी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अ)उपविभागीय अधिकारी ( महसूल ) | अध्यक्ष |
| ब) जिल्हा पोलीस उपअधिक्षक | सदस्य |
| क) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ड) कार्यकारी अभियंता महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ | सदस्य |
| इ) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ म. | सदस्य सचिव |

३) रु.३० लाखांपर्यंतच्या नुकसानीबाबतच्या आगीची चौकशी करण्यासाठी तहसिलदार यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे आग चौकशी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अ) तहसिंलदार | अध्यक्ष |
| ब) वरीष्ठ पोलीस निरीक्षक | सदस्य |
| क) सहाय्यक/ उपअभियंता महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ | सदस्य |
| ड) सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| इ) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ म. | सदस्य सचिव |

४. आगीच्या घटने संबंधिची माहिती संबंधित विभागीय अधिकारी/ सरव्यवस्थापक (खरेदी व प्रकिया ) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ यांनी दुरध्वनीवरुन मा. मंत्री व मा. राज्यमंत्री ( पणन) व शासन यांना त्वरीत कळवावी.

५. आग चौकशी समितीने आग लागल्याची घटना घडल्यापासून ४८ तासांच्या आत आगीबाबतची चौकशी पूर्ण करावी.

६. आगीची चौकशी करताना आग कोणत्या कारणामुळे लागली. व याबाबत संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचा निष्काळजीपणा, हलगर्जीपणा कारणीभूत झाला किंवा कसे हे तपासून पाहून संबंधित सक्षम प्राधिका-याने शासनाच्या निदर्शनास आणावे.

७. आगीच्या ठिकाणी पुरेशा प्रमाणात आग प्रतिबंधक उपाययोजना उपलब्ध होती किंवा कसे ?आग लागण्यामागे घातपात किंवा जाणीवपूर्वक आग लावली गेली किंवा कसे हे तपासून पहावे.

८. या सर्व मुद्दयांविषयी आग चौकशी समितीने सखोल चौकशी करुन तिचा सविस्तर अहवाल एका आठवडयाच्या आत मा. मंत्री ( पणन ) मा. राज्यमंत्री ( पणन) व मा. प्रधान सचिव ( सहकार व पणन ), व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ व सहसचिव ( कापूस ) ( सहकार व पणन विभाग ) यांच्याकडे पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

९. भविष्यात अशा प्रकारे आगी लागू नयेत यासाठी आग चौकशी समितीनेआवश्यक त्या उपाय योजना करण्याबाबत अहवालात शिफारशी कराव्यात.

१०. आगीसंबंधी ग्रेडर, उपविभागीय अधिकारी अथवा अन्य कर्मचारी यांच्याविरुध्द प्रथम दर्शनी सबळ पुरावा आढळून आल्यास संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांना तात्काळ निलंबित करण्याबाबत समितीच्या अहवालात शिफारस करावी.

११.समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादक पणन महासंघाने संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचा लेखी खुलासा घेऊनसादर केलेला खुलासा समाधानकारक आढळून न आल्यास अशा अधिकारी/ कर्मचारी यांस सेवाशर्तीच्य तरतूदीस अनुसरुन निलंबित करण्याची कार्यवाही महासंघाने आपल्या स्तरावर करुन शासनास अवगत करावे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra. govt in या वेबसाइटवर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१००२२६१८४४९००१ अशा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ब. रं. बच्चे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.**

प्रत :-

१) सचिव , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई .
२) सचिव , गृह विभाग, मंत्रालय, मुंबई .
३) सचिव ( उर्जा ),उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई .
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य,पुणे,
६) सर्व विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था ( मुंबई सोडून )
७) व्यवस्थापकीय संचालक, महा.राज्य सह. कापूस उत्पा. पणन महासंघ म,मुंबई,
८) **जिल्हाधिकारी/ उपविभागीय अधिकारी/ तहसिलदार--** नागपूर,यवतमाळ, अकोला, अमरावती,( खामगांव ), बुलढाणा, नांदेड, जळगांव , धुळे, सातारा , औरंगाबाद, परभणी, नासिक, वर्धा, जालना, लातूर, बीड, उस्मानाबाद,सोलापूर, व अहमदनगर.

९) **जिल्हा पोलीस अधिक्षक/ पोलीस उपअधिक्षक /जिल्हयातील पोलीस स्टेशनचे वरीष्ट पोलीस निरीक्षक--** नागपूर,यवतमाळ, अकोला, अमरावती,( खामगांव ), बुलढाणा, नांदेड, जळगांव , धुळे, सातारा , औरंगाबाद, परभणी, नासिक, वर्धा, जालना, लातूर, बीड, उस्मानाबाद,सोलापूर, व अहमदनगर.

१०) **जिल्हा उपनिबंधक/सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था--** नागपूर,यवतमाळ, अकोला, अमरावती,( खामगांव ), बुलढाणा, नांदेड, जळगांव , धुळे, सातारा , औरंगाबाद, परभणी, नासिक, वर्धा, जालना, लातूर, बीड, उस्मानाबाद,सोलापूर, व अहमदनगर.

११)**विभागीय व्यवस्थापक,महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ म.--** नागपूर, वणी,यवतमाळ, अकोला, अमरावती, खामगांव , नांदेड, जळगांव , धुळे, औरंगाबाद, परभणी, वैजनाथ

१२)**अधिक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता/ सहाय्यक अभियंता/ उपअभियंता महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ**--नागपूर,यवतमाळ, अकोला, अमरावती,( खामगांव ), बुलढाणा, नांदेड, जळगांव , धुळे, सातारा , औरंगाबाद, परभणी, नासिक, वर्धा, जालना, लातूर, बीड, उस्मानाबाद,सोलापूर, व अहमदनगर.

१०) निवड नस्ती.(कार्यासन १ स व १० स )

*********